**सहायक सरकारी अभियोक्ता, गट-अ या पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक : डीपीपी-२०११/२९१/प्र.क्र. ६०/पोल-१०**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२, दिनांक : ३० नोव्हेंबर, २०११**

संदर्भ : महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांक :९८६ (१०)/४३९०/आठ, दिनांक १४.०२.२०११

**शासन आदेश** :- शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : एसपीपी-२२९५/प्र.क्र.१४९/पोल-१०, दिनांक २० मे,१९९७ अन्वये संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांच्या अधिनस्त विविध आस्थापनेवर सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट-अ ही रु. ९३००-३४८०० + ग्रेड पे रु. ५०००/- या वेतनश्रेणीतील पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर पदे ही सरळसेवेने महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरावयाची आहेत. त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने वरील संदर्भाधीन दिनांक १४.०२.२०११ च्या पत्रान्वये या पदाकरिता शिफारस केलेल्या ८१ उमेदवारांपैकी खाली दर्शविलेल्या एकूण एका उमेदवाराची परिविक्षाधीन सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट-अ म्हणून खालील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या ठिकाणी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | गु.क्र. | उमेदवाराचे नांव | प्रवर्ग | आयोगाने नियुक्तीसाठी शिफारस केलेला प्रवर्ग | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | ६० | श्री.गजानन मुरलीधर तोडकरी | इ.मा.व. | खुला | कागल, जि. कोल्हापूर |

२. वरील उमेदवारांची नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(१) संबंधीत उमेदवारास नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे लागेल. अन्यथा त्यांना सेवाज्येष्ठता गमवावी लागेल.

(२) परिविक्षा कालावधी, ते नियुक्तीच्या पदावर रुजू झाल्याच्या दिनांकापासून २ वर्षाचा (प्रशिक्षण कालावधी धरुन) असेल.

(३) या पदासाठी विहित केलेले प्रशिक्षण त्यांना पूर्ण करावे लागेल.

(४) सदर परिविक्षाधीन सहाय्यक सरकारी अभियोक्ता यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९ मार्च,२००३ अन्वये संगणक हाताळणी वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त आवश्यक ते प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत विभाग प्रमुखाकडे सादर करणे अनिवार्य राहिल. अन्यथा प्रस्तुत पदावरील त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

(५) सदर उमेदवारांना या आदेशान्वये नियुक्ती दिली असली तरी, त्यांची सेवाज्येष्ठता ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने ठरविलेल्या गुणवत्ता क्रमांकानुसार राहिल.

(६) नियुक्तीवर रुजू होण्यासाठी कराव्या लागणा-या प्रवासासाठी उमेदवारांना प्रवास भत्ता मिळणार नाही.

(७) त्यांनी दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधी किंवा त्यानंतर शासनाने विहित नियमानुसार वाढविलेला परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर त्यांची सहाय्यक सरकारी अभियोक्ता या संवर्गात नियमित नियुक्ती केली जाईल.

(८) त्यांना परिविक्षा कालावधीमध्ये रु.९३००-३४८०० + ग्रेड पे-५०००/- या वेतनश्रेणीत दरमहा रु.१३७१०+५०००/- इतके वेतन मिळेल. परिविक्षा कालावधीमध्ये पहिली वार्षिक वेतनवाढ देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-१३७०/डी, दिनांक १२.४.१९७२ नुसार देण्यात येईल. त्यांना नियमाप्रमाणे महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय रहातील.

(९) ते जर दोन वर्षाच्या कालावधीच्या आत किंवा वाढविलेल्या परिविक्षा कालावधीमध्ये कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त करु शकले नाहीत आणि/किंवा विहित परिक्षा/चाचण्या उत्तीर्ण झाले नाहीत किंवा गैरवर्तणुकीबद्दल दोषी आढळले किंवा शासकीय सेवेत अभियोग्य नसतील तर त्यांची सेवा समाप्त करण्यात येईल.

(१०) नियमाप्रमाणे उमेदवारांना विहित मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण व्हावे लागेल.

(११) वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्त्याखालील गट-अ च्या अधिका-यांना लागू असलेले अन्य सर्व सेवाविषयक नियम त्यांना लागू होतील.

(१२) उमेदवारांची पदस्थापना सदर शासन निर्णयात दर्शविण्यात आलेल्या ठिकाणीच करण्यात येईल व जिल्हांतर्गत व्यवस्था म्हणून संबंधित सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता यांच्याकडून इतरत्र करण्यात येणार नाही, याबाबतची दक्षता संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी घ्यावी.

(१३) उमेदवारांना शासन निर्णय, वित्त विभाग, क्रं.अंनियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१.१०.२००५ नुसार विहित केलेली परिभाषित अंशदायी निवृत्ती योजना लागू राहील.

( १६) वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्त्याखालील राज्य सेवा अधिका-यांना लागू असलेले अन्य सर्व सेवाविषयक नियम सदर उमेदवारांना लागू होतील.

३. प्रस्तुत आदेश सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग आणि विधी व न्याय विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन आदेश राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११११३०१२५४३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि.वि.दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
३) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
४) महालेखापाल- १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई
५) मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
६) प्रधान सचिव (अ.व सु.), यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई
७) सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, कोल्हापूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
९) संबधीत उमेदवार
१०) निवड नस्ती